**एशियन फुटबॉल कॉन्फडरेशन द्वारा आयोजित आशियाई चषक महिला फुटबॉल स्पर्धा-२०२२ च्या आयोजनासाठी उच्चस्तर समिती व कार्यकारी समित्यांची स्थापना करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एएफसी-३४२१/प्र.क्र.१९०/क्रीयुसे-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख : ०१ ऑक्टोबर, २०२१

**प्रस्तावना :**

एशियन फुटबॉल कॉन्फेडरेशन द्वारा महिला आशियाई फुटबॉल स्पर्धा भारतात दिनांक २० जानेवारी,२०२२ ते दिनांक ०६ फेब्रुवारी, २०२२ या कालावधीत आयोजित केली आहे. महिला आशियाई फुटबॉल स्पर्धा ही आंतरराष्ट्रीय स्तरावरील स्पर्धा असून आशिया खंडातील १२ देश यामध्ये सहभागी होत आहेत. त्यामुळे या स्पर्धा आयोजनास विशेष महत्व आहे. सदर स्पर्धेसाठी आतंरराष्ट्रीय स्तरावरील सुविधा उपलब्ध करण्यात येणार आहेत. जागतिक स्तरावर कोविड-१९ च्या महामारीमुळे निर्माण झालेल्या परिस्थितीत, स्पर्धेसाठी उपस्थित राहणाऱ्या संघांतील खेळाडूंना कमीत कमी प्रवास करावा लागेल. याद्दष्टीने, अखिल भारतीय फुटबॉल फेडरेशन व एशियन फुटबॉल कॉन्फेडरेशन यांनी ही स्पर्धा एकाच व जवळच्या क्षेत्रातील ठिकाणी आयोजित करण्याचे ठरविले आहे. त्यानुसार सदर स्पर्धा मुंबई, नवी मुंबई व पुणे येथील अनुक्रमे अंधेरी स्पोर्टस कॉम्प्लेक्स, मुंबई, डि.वाय.पाटील स्टेडियम, नेरुळ, नवी मुंबई व शिवछत्रपती क्रीडा संकुल, महाळुंगे-बालेवाडी, पुणे येथे आयोजित करण्यात येणार आहे. या स्पर्धेसाठी प्रत्येक ठिकाणी एक मुख्य मैदान व किमान तीन सराव मैदानांची आवश्यकता आहे. या स्पर्धेच्या आयोजनासाठी पुणे येथे पायाभूत सुविधा उभारणी तसेच, पुणे, नवी मुंबई व मुंबई येथे या स्पर्धेच्या अनुषंगाने सुरक्षा, वैद्यकीय सुविधा, खेळाडूंच्या प्रवासाची साधने इ. बाबी उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. यासाठी राज्य शासनस्तरावर एक उच्चस्तरीय समिती व मुंबई आणि पुणे येथे प्रत्येकी एक याप्रमाणे दोन वेगवेगळया कार्यकारी समित्या गठीत करण्याची व त्यांची कार्यकक्षा ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

एशियन फुटबॉल कॉन्फेडरेशन द्वारा महिला आशियाई फुटबॉल स्पर्धा भारतात दिनांक २० जानेवारी,२०२२ ते दिनांक ०६ फेब्रुवारी, २०२२ या कालावधीत आयोजित करण्यात येत आहे. या स्पर्धेचे आयोजन व संनियंत्रणाकरीता खालीलप्रमाणे समित्या गठीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

अ) उच्चस्तर समिती:

| | | |
|---|---|---|
| | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| | अपर मुख्य सचिव,गृह विभाग | सदस्य |
| | अपर मुख्य सचिव,वित्त विभाग | सदस्य |
| | अपर मुख्य सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| | अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | सदस्य |
| | प्रधान सचिव, नगर विकास विभाग-१ | सदस्य |
| | प्रधान सचिव, मदत व पुनर्वसन विभाग | सदस्य |
| | आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य,पुणे | सदस्य-सचिव |
| | सह/उपसचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | सदस्य-सहसचिव |

समितीची कार्यकक्षा:

१. स्पर्धेच्या आयोजनासाठी राज्य शासनाच्यावतीने सर्व सुविधा व्यवस्थित पुरविणेबाबत मार्गदर्शन करणे.

२. क्रीडा स्पर्धेच्या अनुषंगाने शासनस्तरावरुन ज्या बाबींवर निर्णय अपेक्षित आहे, अशा सर्व बाबींबाबत निर्णय घेऊन, त्यांची अंमलबजावणी करणे.

ब) कार्यकारी समिती क्र.१ (मुंबई व नवी मुंबई येथील सामन्यांसाठी)

| | | |
|---|---|---|
| | विभागीय आयुक्त, कोंकण विभाग | अध्यक्ष |
| | अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई | सदस्य |
| | पोलीस आयुक्त, मुंबई | सदस्य |
| | आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, नवी मुंबई | सदस्य |
| | पोलीस आयुक्त, नवी मुंबई | सदस्य |
| | जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर | सदस्य |
| | जिल्हाधिकारी, ठाणे | सदस्य |
| | उप आयुक्त (आरोग्य), बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई | सदस्य |
| | उप आयुक्त (आरोग्य), नवी मुंबई महानगरपालिका, मुंबई | सदस्य |
| | अखिल भारतीय फुटबॉल महासंघ, यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| | उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई | सदस्य-सचिव |

**समितीची कार्यकक्षा:**

१. स्पर्धेच्या अनुषंगाने उच्चस्तरीय समितीने घेतलेल्या निर्णयांची अंमलबजावणी करणे.

२. स्पर्धेच्या अनुषंगाने सुरक्षा व्यवस्था, वैद्यकीय व्यवस्था पुरविणे.

३. स्पर्धेच्या अनुषंगाने निवास व भोजन व्यवस्था, वाहतुक व्यवस्था यासाठी स्पर्धा संयोजन समितीस सहकार्य करणे.

४. स्थानिक आयोजन समिती, आशियाई महिला फुटबॉल चषक स्पर्धा, २०२२ व कार्यकारी समिती क्र.१ यांच्यामधील कामाचे स्वरुप निश्चित करणे.

**क) कार्यकारी समिती क्र.२ (पुणे येथील सामन्यांसाठी)**

| | | |
|---|---|---|
| | विभागीय आयुक्त, पुणे विभाग | अध्यक्ष |
| | आयुक्त, पुणे महानगरपालिका,पुणे | सदस्य |
| | आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे | सदस्य |
| | आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे | कार्याध्यक्ष |
| | पोलीस आयुक्त, पुणे | सदस्य |
| | पोलीस आयुक्त, पिंपरी-चिंचवड, पुणे | सदस्य |
| | जिल्हाधिकारी, पुणे | सदस्य |
| | मुख्य कार्यकारी अधिकारी तथा महानगर आयुक्त,PMRDA, पुणे | सदस्य |
| | अखिल भारतीय फुटबॉल फेडरेशन यांचे प्रतिनिधी | सदस्य-सचिव |
| | सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे | निमंत्रित |

**समितीची कार्यकक्षा:**

१. स्पर्धेच्या अनुषंगाने उच्चस्तरीय समितीने घेतलेल्या निर्णयांची अंमलबजावणी करणे.

२. स्पर्धेच्या अनुषंगाने पायाभूत सुविधांची उपलब्धता करुन देणे.

३. स्पर्धेच्या अनुषंगाने सुरक्षा व्यवस्था, वैद्यकीय व्यवस्था पुरविणे.

४. स्पर्धेच्या अनुषंगाने निवास व भोजन व्यवस्था, वाहतुक व्यवस्था यासाठी स्पर्धा संयोजन समितीस सहकार्य करणे.

५. स्थानिक आयोजन समिती, आशियाई महिला फुटबॉल चषक स्पर्धा, २०२२ व कार्यकारी समिती क्र.२ यांच्यामधील कामाचे स्वरुप निश्चित करणे.

६. सदर स्पर्धेच्या अनुषंगाने शिवछत्रपती क्रीडा संकुल, बालेवाडी, पुणे संकुलात सुरु केलेल्या / करावयाच्या कामांना कार्यकारी समितीची मान्यता/ कार्योत्तर मान्यता देणे.

२. कार्यकारी समित्यांच्या बैठकांना आवश्यकतेनुसार संबंधित विषयाशी निगडीत तज्ञांना आमंत्रित करण्याचे अधिकार दोन्ही कार्यकारी समिती अध्यक्षांना राहतील.

३. आशियाई चषक महिला फुटबॉल स्पर्धा, २०२२ साठी गठीत केलेल्या उपरोक्त तिन्ही समित्या, स्पर्धेचे कामकाज पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीसाठी अंमलात राहतील, स्पर्धेचे कामकाज संपल्यानंतर या समित्या आपोआप संपुष्टात येतील.

४. या शासन निर्णयातील तरतूदी शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू होतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००११७२२४०२४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2021.10.01 17:23:50 +05'30'

**( स्वा. म. नानल )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव
४) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव
५) मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव
६) मा.राज्यमंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव
७) सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानसभा,
८) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
९) अप्पर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव, नगर विकास विभाग-१, मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई

१५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६) विभागीय आयुक्त, कोंकण विभाग/पुणे विभाग,
१७) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, नवी मुंबई
१८) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे
१९) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी,पुणे
२०) अतिरिक्त आयुक्त,बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
२१) पोलीस आयुक्त, मुंबई /नवी मुंबई / पुणे /पिंपरी-चिंचवड
२२) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर / ठाणे / पुणे,
२३) मुख्य कार्यकारी अधिकारी तथा महानगर आयुक्त,PMRDA, पुणे
२४) सह/उपसचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२५) सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे
२६) उप आयुक्त (आरोग्य), बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
२७) उप आयुक्त (आरोग्य), नवी मुंबई महानगरपालिका, नवी मुंबई
२८) विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा. (आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्यामार्फत)
२९) सचिव, अखिल भारतीय फुटबॉल महासंघ, (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
३०) कार्यासन, क्रीयुसे-२ व क्रीयुसे-३,
३१) निवडनस्ती, क्रीयुसे-१.